केंद्र व राज्य पुरस्कृत Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System (SMART-PDS) या योजनेसाठी आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२३/प्र.क्र.५०/सं.क.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दि. १२ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :-**

१. केंद्र शासनाच्या खाद्य व सार्वजनिक वितरण विभाग यांचे क्र.F.No.४(१)/२०२०-compcell (E ३७०९२६), दि.४.०५.२०२३ रोजीचे पत्र
२. केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाचे F.No.१(१३) PFMS/FCD/२०२०, दि.२३.०३.२०२१ व दि.१२.०४.२०२१
३. शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२३/प्र.क्र५०/सं.क., दि.२७.०२.२०२४
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि.१.०७.२०२१
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२१/प्र.क्र.८४/कोषा प्रशा-५, दि.१५.०९.२०२१
६. शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२३/प्र.क्र५०/सं.क., दि.११.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०२३-२०२६ या ३ वर्षाच्या कालावधीकरीता Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System (SMART-PDS) या केंद्र व राज्य पुरस्कृत योजनेला संदर्भाधीन क्र.१ येथील दि.४.०५.२०२३ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत End to End Computerisation व integrated management of Public distribution system (ImPDS) योजनेतर्गत राबविलेल्या तंत्रज्ञानातील सुधारणा टिकवून ठेवणे व भविष्यात सदर तंत्रज्ञानाचे अद्ययाविकरण करणे हा SMART-PDS योजनेचा उद्देश आहे. सदर योजनेच्या खर्चाकरिता केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० असा आहे. केंद्र शासनाच्या खाद्य व सार्वजनिक वितरण विभागाशी Memorandum of Understanding (MoU) करण्यात आला आहे. तसेच संदर्भाधीन क्र.२ च्या दि.२७.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२३-२६ या कालावधीकरीता केंद्र शासनाच्या Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System (SMART-PDS) या योजनेची राज्यात अंमलबजावणी करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सुधारित कार्यपद्धतीनुसार प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी संबंधित प्रशासकीय विभागाने एका Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करुन त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेमध्ये Single Nodal Bank Account सुरु करणे आवश्यक आहे. त्यानुसार विभागाच्या संदर्भाधीन क्र.६ च्या शासन निर्णयान्वये Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System (SMART-PDS) या केंद्र व राज्य पुरस्कृत योजना (केंद्र व राज्य हिस्सा ६०:४०) अंमलबजावणी साठी वित्तीय सल्लागार व उपसचिव यांची Single Nodal Agency (SNA) म्हणून व सहसचिव/उपसचिव (संगणक कक्ष) यांची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच, बँक ऑफ बडोदा मध्ये Single

Nodal Bank Account उघडण्यात आले असून PFMS प्रणालीवर SMART-PDS योजनेअंतर्गत निधी आदानप्रदान करण्यासाठी ४२२१- Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System (SMART-PDS) (MH५८८) योजनेकरिता लेखाअधिकारी, वित्तीय सलागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी (Drawing & Disbursing Officer) म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

केंद्र व राज्य पुरस्कृत योजना (केंद्र व राज्य हिस्सा ६०:४०) ४२२१- Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System (SMART-PDS) (MH५८८) करिता आहरण व संवितरण अधिकारी (Drawing & Disbursing Officer) म्हणून लेखाअधिकारी, वित्तीय सलागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई (आहरण व संवितरण संकेतांक ७१०१००५३६१) यांना घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून तयाचा संकेतांक २०२४०८१२१६३६३७७५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANTOSH UMESHRAO GAIKWAD

Digitally signed by SANTOSH UMESHRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BC8833F9E213A7E4DFB9D2B071C9202EA52A04054E53B0C1BBF9E50C90A2CF5C, cn=SANTOSH UMESHRAO GAIKWAD
Date: 2024.08.12 16:51:56 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
६. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
७. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, जी. टी. हॉस्पिटल संकूल, मुंबई
१०. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता-१/२, मुंबई/नागपूर
११. मालेखापाल, लेखापरिक्षा- १/२, मुंबई/नागपूर
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
१४. सर्व उपसचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१५. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१६. निवडनस्ती (कार्यासन स.क.).